**राज्यातील जलसंपदा विभागातंर्गत मध्यम व लघु पाटबंधारे प्रकल्पातील गाळ काढण्यासाठी प्रमाणित स्वरुपातील प्रारुप निविदा तयार करण्यासाठी समिती गठित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः लाक्षेवि-२०१७/(७८/२०१७)/लाक्षेवि (आस्था)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०१.०६.२०१७

वाचा -

१) जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र. मेरीना-२०१४/(प्र.क्र.१८२/१४)/ लाक्षेवि (आस्था), दि. ४.०५.२०१७

२) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक समिती २०१४/प्र.क्र.३४१/१४ मोप्र-१ दि.०४.०३.२०१५

**प्रस्तावना -**

राज्यातील जुन्या धरणात साठलेला गाळ काढून तो शेतामध्ये वापरुन शेत जमिनीची उत्पादन क्षमता वाढविणे व त्याचबरोबर राज्यातील सर्व धरणांचे जलाशय गाळमुक्त करण्याचे धोरण शासनाने स्वीकारले असून मोठया पाटबंधारे प्रकल्पातील गाळ /गाळमिश्रीत रेती /वाळू निष्कासनाचे धोरण शासन निर्णय क्र. मेरीना-२०१४/(प्र.क्र.१८२/१४)/लाक्षेवि (आस्था), दि. ४.०५.२०१७ अन्वये निर्गमित केले आहे. सदर शासन निर्णयामध्ये मोठया प्रकल्पातून गाळ व गाळ मिश्रीत वाळूच्या निष्कासनासाठी ई-निविदेची कार्यपध्दती, कंत्राटाच्या अटी व शर्ती शासन मान्यतेने पाटबंधारे विकास महामंडळांनी निश्चित कराव्यात, असे निर्देश आहेत. त्यानुषंगाने कंत्राटाच्या अटी व शर्ती निश्चित करण्यासाठी व प्रमाणित स्वरुपातील प्रारुप ई-निविदा तयार करण्यासाठी समिती गठित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक-**

संदर्भ क्र. १ मधील शासन निर्णयामध्ये मोठया प्रकल्पातून गाळ व गाळ मिश्रीत वाळूच्या निष्कासनासाठी ई-निविदेची कार्यपध्दती, कंत्राटाच्या अटी व शर्ती शासन मान्यतेने पाटबंधारे विकास महामंडळ यांनी निश्चित कराव्यात असे निर्देश आहेत. त्यानुषंगाने राज्यातील जलसंपदा विभागातंर्गत मोठया प्रकल्पातील गाळ काढण्याबाबत कंत्राटाच्या अटी व शर्ती सह प्रमाणित स्वरुपातील प्रारुप ई-निविदा तयार करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

.

| अ.क्र. | नाव व पदनाम | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री.रा.ब.घोटे, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे | अध्यक्ष |
| २ | श्री.अ.वा.सुर्वे, कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर | सदस्य |
| ३ | श्री. ह.आ.ढंगारे, कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद | सदस्य |
| ४ | श्री.सं.दे. कुलकर्णी, कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव | सदस्य |
| ५ | श्री.र.ए.उपासनी, मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक | सदस्य |
| ६ | मुख्य अभियंता, यांत्रिकी विभाग, नाशिक | सदस्य |
| ७ | श्री.म.ई.धरणे, उप सचिव (लाक्षेवि) (जलसंपदा विभाग) मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

प्रमाणित स्वरुपातील प्रारुप ई- निविदा तयार करताना काही तज्ञांची गरज भासल्यास त्यांना आवश्यकतेनुसार विशेष निमंत्रित म्हणून बैठकीस आमंत्रित करण्याचे व शासन निर्णय क्रमांक समिती २०१४/प्र.क्र.३४१/१४ मोप्र-१ दि.०४.०३.२०१५ मधील दरांनुसार मानधन अदा करण्याचे अधिकार समिती अध्यक्षांना राहतील. मानधन प्रित्यर्थ होणारा खर्च महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांनी उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

समितीने आपला अहवाल तात्काळ शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०६०११५५५३३४९२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2017.06.01 16:00:33 +05'30'

**(म.ई.धरणे)**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधान भवन, मुंबई
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानपरिषद, विधान भवन, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
६) मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

७) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव

८) सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

९) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर

१०) महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर

११) प्रधान सचिव, वित्त विभाग /नियोजन विभाग/ ग्राम विकास व जलसंधारण विभाग/ कृषी विभाग

१२) स्वीय सहायक, प्रधान सचिव (जसंप्र व वि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३) स्वीय सहायक, सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था (मेरी), नाशिक.

१६) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग

१७) सर्व विभागीय आयुक्त

१८) मुख्य अभियंता (पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९) सर्व मुख्य अभियंते, जलसंपदा विभाग.

२०) सर्व जिल्हाधिकारी

२१) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.

२२) उप सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२३) सर्व कार्यकारी अभियंते, जलसंपदा विभाग.

२४) सर्व तांत्रिक कार्यासन, जलसंपदा विभाग

२५) निवड नस्ती.